**राज्यातील ऊसतोड कामगारांची बाह्यस्त्रोत यंत्रणेकडून नोंदणी/सर्व्हेक्षण करण्यासाठी ई-निविदा प्रक्रिया राबवून एजन्सीची नियुक्ती करण्याकरीता प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: बैठक-२०२१/प्र. क्र.१०४/महामंडळे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०२२

**वाचा :**

(१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.असंका-१११२०/प्र.क्र.२०/काम-७अ, दिनांक २४.२.२०२०
(२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक बैठक-२०२०/प्र.क्र.९४/ महामंडळे, दिनांक ४ ऑगस्ट, २०२१
(३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक बैठक-२०२०/प्र.क्र.९४/ महामंडळे, दिनांक २१ सप्टेंबर, २०२१
(४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक बैठक-२०२१/प्र.क्र.१०४/ महामंडळे, दिनांक २८ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना:-**

राज्यातील ऊसतोड कामगारांचे व पर्यायाने त्यांच्या कुटूंबियांचे जीवन अस्थिर व अत्यंत हलाखीचे असल्यामुळे त्यांचे जीवन सुखकारक करून त्यांचे राहणीमान उंचावून आयुष्य स्थिर व सुरक्षित करण्यासाठी ऊस तोडणी व्यवसायातील ऊसतोड कामगारांना विविध कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठी उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. असंका १११९/ प्र.क्र.११०/काम.७अ, दिनांक १३ सप्टेंबर,२०१९ अन्वये गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ स्थापन करण्यात आले आहे. या ऊसतोड कामगारांना शासनाच्या विविध योजनांचा लाभ घेता यावा यासाठी सदर कामगारांची नोंदणी/सर्व्हेक्षण जलद गतीने होणे आवश्यक आहे. यास्तव, सदर काम एजन्सी मार्फत बाह्यस्त्रोत/आऊटसोर्सिंगद्वारे सन २०२१-२२ या गळीत हंगामासाठी करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ऊसतोड कामगारांना व त्यांच्या कुटूंबीयांना विविध योजनांचा लाभ देण्यासाठी त्यांची नोंदणी/सर्व्हेक्षण होणे आवश्यक आहे. हे काम अचुकरित्या होण्यासाठी दिनांक २४.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये वेब/मोबाईल ॲप्लिकेशन तयार करण्यात येत आहे.

ऊसतोड कामगारांच्या कल्याणासाठी विविध योजना राबविण्यासाठी त्यांचे प्रथमत: नोंदणी/ सर्व्हेक्षण होण्याच्या दृष्टीने सदरचे काम एजन्सीमार्फत बाह्यस्त्रोत/आऊटसोर्सिंगद्वारे करण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे. निवडण्यात आलेली एजन्सी हे काम वेब/मोबाईल ॲप्लिकेशनद्वारे ऑनलाईन पद्धतीने आवश्यकतेप्रमाणे ऑफलाईन पध्दतीनेही पार पाडेल. याबाबतचे समन्वयन व संनियंत्रण आयुक्त, समाजकल्याण यांचेमार्फत करण्यात येईल. एजन्सीची नियुक्ती करताना खालील बाबी/अटींचे पालन करण्यात यावे.

(१) एजन्सी नेमताना ई-निवीदा प्रक्रिया राबवून शासनाच्या विहित अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

(२) एजन्सीकडे राज्यातील सर्व ऊस उत्पादक क्षेत्रात जावून सर्व्हेक्षण करण्यासाठी आवश्यक मनुष्यबळ बंधनकारक असेल.

(३) यापुर्वी अशा स्वरुपाचे सर्व्हेक्षण केलेल्या कामाचा अनुभव असावा.

(४) नजिकच्या काळात सर्व्हेक्षणाचे काम वेब/मोबाईल ॲप्लिकेशनद्वारे करण्याचे प्रस्तावित असल्याने संबंधित एजन्सीला ते पुर्ण करून देणे बंधनकारक राहील. याकरिता कोणताही अतिरिक्त मोबदला दिला जाणार नाही.

(५) वेब/मोबाईल ॲप्लिकेशनद्वारे सर्व्हेक्षण/नोंदणी करणे सुरु होईपर्यंत ऑफलाईन पध्दतीने केलेल्या सर्व्हेक्षणाची माहिती वेब/मोबाईल ॲप्लिकेशन सुरु झाल्यानंतर त्यामध्ये भरणे (Data Entry करणे) बंधनकारक असेल.

सदरचा खर्च मागणी क्रमांक एन्-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाज कल्याण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना वित्तीय सहाय्य, (०१) समाज कल्याण संस्थांना अनुदाने, (०१)(०१) गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळास वित्तीय सहाय्य, (२२३५ C

५१९), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षांतर्गत करण्यात आलेल्या अर्थसंकल्पित तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०२२०१२४१२३७१२३५२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DADA NAMDEV KOKADE

Digitally signed by DADA NAMDEV KOKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=81a9fee3e4fab545aa40bccc4ad46860efda515529664997a6109103e96f41e3, pseudonym=11F7570D4AD03CA9BC03A2C509E88C40A45864CC, serialNumber=D68C50095DDB3F1662543F4BA76407E09A62E57DC68B1B1DA9B6922646458AAE, cn=DADA NAMDEV KOKADE
Date: 2022.01.24 12:39:28 +05'30'

**( दा. ना. कोकडे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई
५. मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई
६. मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय , मुंबई.
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय ,मुंबई
९. मा. प्रधान सचिव, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०.मा.महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपुर
११.आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.आयुक्त, कामगार, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३.आयुक्त, साखर, पुणे
१४.सर्व जिल्हाधिकारी
१५.सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण
१६.निवड नस्ती (महामंडळे).